**पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील संचालक गट-अ व प्रशासन अधिकारी गट- ब ही पदे अपंग संवर्गासाठी सुनिश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
**शासन निर्णय क्रमांकः पुवसं- २०१३/ प्र.क्र. १९६ / सां.का.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२
तारीख: २४ जुलै २०१४

<u>वाचा</u>

१) केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारिता , मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि.१८.१.२००७ व दि.१५.३.२००७ ची शासन अधिसूचना

२) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष न्याय विभाग, क्र.न्यायाप्र - २०११/ प्र.क्र.४/सुधार-३, दिनांक: १७ मार्च, २०११

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष न्याय विभाग, क्र. अपंग - २०११/ प्र.क्र.१७७/ सुधार-३, दिनांक: १५ ऑक्टोबर, २०११

## शासन निर्णय

सामाजिक न्याय विभागाने दि.१७.३.२०११ च्या शासन निर्णयातील (१) नुसार केंद्र शासनाने अपंगांसाठी सुनिश्चित केलेली गट-अ, गट-ब, गट-क व गट-ड मधील जी पदे राज्य शासनाच्या आस्थापनेवर समान आहेत अशी पदे सुनिश्चित केली आहेत. त्यास अनुसरुन केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारिता , मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि.१८.१.२००७ व दि.१५.३.२००७ च्या अधिसूचनेतील अ.क्र. ३६ येथील प्रशासकीय अधिकारी गट-ब व पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयातील प्रशासन अधिकारी गट-ब ही पदे समान असल्याने प्रशासन अधिकारी पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालनालय हे पद OL, OA, BL, HH, B, LV या प्रवर्गातील अपंग व्यक्ती सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तसेच सामाजिक न्याय विभागाच्या दि.१७.३.२०११ च्या शासन निर्णयातील (२) नुसार "केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या यादीतील ज्या पदांची कर्तव्ये जबाबदाऱ्या, कामांचे स्वरुप व ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी समान आहे अशा पदांची पदनामे जरी भिन्न् असली तरी ती अपंगासाठी सुनिश्चित राहतील." या तरतूदीनुसार अधिसूचनेच्या यादीतील अ.क्र.८९ चे येथील डेप्युटी कीपर (Pre Historic Archaeology) (गट-अ) या पदाची कर्तव्य व जबाबदाऱ्या या संचालक, पुरातत्व या पदाशी मिळत्या जुळत्या असून ही दोन्ही पदे गट-अ या संवर्गातील

आहेत. सबब दोन्ही पदांची पदनामे जरी भिन्न असली तरी डेप्युटी कीपर पदासाठी सुनिश्चित केल्यानुसार संचालक हे पद OA, OL, HH या प्रवर्गातील अपंग व्यक्तीस सुनिश्चित करण्याची बाब विचाराधीन होती.

यास्तव संचालक गट अ व प्रशासन अधिकारी गट-ब ही पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयतील पदे खालीलप्रमाणे अपंग संवर्गासाठी सुनिश्चित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | पदनाम | गट | पदसंख्या | अंध / अल्पदृष्टी (दृष्टीक्षिणता) | कर्णबधीर | अस्थिव्यंग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | संचालक | अ | १ | - | पात्र (HH) | पात्र (OL,OA) | -- |
| २ | प्रशासन अधिकारी | ब | १ | पात्र (B, LV) | पात्र (HH) | पात्र (OL,OA, BL) | ---- |

HH - Hearing Handicapped, OL- One Leg, OA - One Arm, BL - Both Leg, B- Blind, LV- Low Vision

पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील संचालक वर्ग-अ व प्रशासन अधिकारी वर्ग-ब ही पदे सरळसेवेने भरती करतांना उपरोक्त विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे अपंग व्यक्तींकरिता सुनिश्चित करण्यात येत आहे. सदर पदांवर अपंग व्यक्तींची निवड करण्यापूर्वी ते खाली नमूद केलेल्या अटी पूर्ण करतात याची खातरजमा करण्यात यावी:-

१) उमेदवार संबंधित सेवाप्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार अर्हताधारक असावा.

२) संबंधित पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या आणि उपरोक्त विवरणपत्रा मधील

४) निकष लक्षात घेऊन सिव्हील सर्जन यांनी नियुक्तीसाठी सक्षम ठरविले आहे.

३) अपंगत्वाचे प्रमाण किमान ४०% असावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२४१६५५२०३७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sushila Dhondiram Pawar

Digitally signed by Sushila Dhondiram Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TCA, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Sushila Dhondiram Pawar
Date: 2014.07.24 16:58:32 +05'30'

**सुशिला पवार**

कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

४. उप सचिव (पर्यटन/सांस्कृतिक कार्य/आस्थापना) यांचे स्वीय सहाय्यक,प. व सां.का.वि. मंत्रालय, मुंबई
५. संचालक, पुरातत्व वस्तुसंग्रहालय विभाग, मुंबई
६. सामान्य प्रशासन विभाग (का. १६-अ) , मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
७. अवर सचिव (सुधार-३), सा.न्या., सां.का. व वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
८. सर्व कार्यासने पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मंत्रालय मुंबई ३२/निवड नस्ती का. सांका-३